राज्यातील जिल्हा परिषदांतर्गत येणाऱ्या प्राथमिक शाळांच्या देखभाल व दुरूस्ती व इतर अनुषंगिक खर्चासाठी जिल्हा परिषद सेस फंडातून (स्वनिधी) ५% राखीव ठेवण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्रामविकास व पंचायतराज विभाग
शासन निर्णय क्र.जिसेफ २०१९/ प्र.क्र.८२/ वित्त-३
मंत्रालय, मुंबई -४०००३२
दिनांक :-११ फेब्रवारी, २०२०

**प्रस्तावना :-**

शालेय शिक्षण व क्रिडा विभाग शासन निर्णय क्रमांक एमएमए-२३५१ प्र.क्र.६१/ एसएम-१, दि.९ मार्च,२०१५ अन्वये सर्व शिक्षा अभियान योजनेतंर्गत जिल्हापरिषदेच्या शाळांना मुलभूत भौतिक सुविधांचे बांधकामे करण्यात येते.सदर योजनातंर्गत जिल्हा परिषद प्राथमिक शाळा इमारत बांधकाम व सुधारणा,देखभाल व दुरूस्तीच्या कामांचा समोवश करण्यात आलेला आहे. जिल्हा परिषद प्राथमिक शाळा बांधकाम देखभाल/ दुरूस्ती विषयक कामकाज शालेय शिक्षण व क्रिडा विभागात हाताळण्यात येते. तसेच जिल्हा परिषदांच्या प्राथमिक शाळांचे दैनदिन कामकाज भागविण्यासाठी ४ % सादील अनुदान शालेय शिक्षण विभागामार्फत वेळोवेळी निधीचे वितरीत करण्यात येते.तसेच राज्यातील सर्व प्राथमिक शाळाच्या विद्यार्थ्यांना शालेय पोषण आहार योजना अंतर्गत आहार वितरण आणि शालेय विद्यार्थ्यांना शैक्षणिक साहित्य गणवेश नियमितपणे शालेय शिक्षण विभागाकडून निधीचे वितरण व नियंत्रण करण्यात येते. प्रसंगत: नमूद करण्यात येते की, UDISE Plus सन २०१८-१९ नुसार राज्यात जिल्हा परिषदेच्य एकूण ६१०२५ शाळा आहेत. या शाळांच्या देखभाल व दुरूस्ती व इतर अनुषंगिक खर्चासाठी निधी कमी प्रमाणात उपलब्ध होत असल्याने जिल्हा परिषद सेस फंडातून स्वनिधी ५% राखीव ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याअनुषंगाने खालील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

या शासन निर्णयाद्वारे राज्यातील जिल्हा परिषदांतर्गत येणा-या प्राथमिक शाळांच्या देखभाल व दुरुस्ती व इतर अनुषंगिक खर्चासाठी जिल्हापरिषदांना प्राप्त होत असलेल्या सेस फंडातून स्वनिधी ५% राखीव ठेवण्यात शासन मान्यता देण्यात येत आहे. सदर निधीचा विनियोग हा जिल्हा परिषदांतर्गत येणा-या प्राथमिक शाळांच्या देखभाल व दुरुस्ती व इतर अनुषंगिक खर्चासाठीच करण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००२१११३१८४४७६२० असा आहे. हा आदेश डिजीटर स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijay Govindrao Chandekar

Digitally signed by Vijay Govindrao Chandekar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400001, st=Maharashtra, 2.5.4.20=c4af9d57960c0b17c06d02fa756c6ceed7f4d72aa8975c42ae154baec55f5699, cn=Vijay Govindrao Chandekar
Date: 2020.02.11 15:11:19 +05'30'

**( विजय गो. चांदेकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय,
३) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई
४) मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई,
५) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय,विधानभवन, मुंबई,
६) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद , मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई,
७) मा.मंत्री, ग्राम विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,
८) मा.मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,
९) मा. राज्यमंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१०) सर्व विभागीय आयुक्त,
११) प्रधान सचिव (ग्राम विकास विभाग) यांचे स्वीय सहायक, ग्रा.वि.विभाग,मंत्रालय, मुंबई,
१२) प्रधान सचिव ( शालेय शिक्षण व क्रिडा ) यांचे स्वीय सहायक, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई,
१४) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर,
१५) जिल्हाधिकारी (सर्व ),
१६) अध्यक्ष, जिल्हा परिषद सर्व,
१७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१८) निवड नस्ती /वित्त -३